राज्यातील कृषी व यंत्रमाग ग्राहक यांना वीज दरात सवलत दिल्यामुळे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य (रोखीने) सन २०१८-२०१९.

**महाराष्ट्र शासन**
**ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.निधिवी-२०१८/प्र.क.४५/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : २० फेब्रुवारी, २०१९

**संदर्भ** :- १) शासन परिपत्रक वित विभाग अर्थसं-२०१८/प्रक्र.६९/अर्थ-३ दि.०२.०४.२०१८
२) शासन निर्णय ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. निधिवी-२०१८/प्र.क.४५ /ऊर्जा-३, दिनांक २४.०५.२०१८, दिनांक १४.११.२०१८ व दिनांक ११.१२.२०१८
३) शासन निर्णय ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. टॅरिफ-२०१८/प्र.क्र.७४/ऊर्जा-३, दिनांक २४.०८.२०१८ चे दोन आदेश
४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक: अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. २५ जानेवारी, २०१९.

**प्रस्तावना** :-

राज्यातील विविध वर्गातील ग्राहकांना शासनाच्या धोरणानुसार वीज दरात सवलत देण्यात येते. याकरिता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी यांना वित्तीय वर्ष २०१८-१९ मध्ये मागणी क्रमांक के-६ मुख्य लेखाशिर्ष २८०१२६१५ या लेखाशीर्षाखाली पुरवणी मागण्यांसह एकूण रु.६९४१.४१ कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. अर्थसंकल्पित तरतूदीपैकी संदर्भ क्र. २ व ३ येथील शासन निर्णयान्वये रू.१५९५.७६ कोटी समायोजनाने व रुपये १६८२.७९ कोटी रोखीने अशी एकूण रु. ३२७८.५५ कोटी वितरीत करण्यात आली आहे. उर्वरित तरतूदीपैकी रू. ५६५.४१ कोटी इतकी रक्कम महावितरण कंपनीस रोखीने वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

कृषी ग्राहक व यंत्रमाग ग्राहक यांना सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात वीज दरात दिलेल्या सवलतीसाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना देय असलेली अर्थसहायाची रक्कम रू.५६५.४१ कोटी (रुपये पाचशे पासष्ट कोटी एक्केचाळीस लाख फक्त) रोखीने वितरीत करण्यास या निर्णयाद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. उक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च “मागणीक्रमांक के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, ८०० इतर खर्च, (००) (०१) कृषी विषयक व यंत्रमाग विषयक प्रशुल्क कमी करण्यासाठी वीज वितरण / पारेषण अनुज्ञप्तीधारकांना अर्थसहाय्य (२८०१२६१५), ३३ अर्थसहाय्य (कार्यक्रम)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी मुंबई यांचेमार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (उर्जा-३) आणि नियंत्रण अधिकारी म्हणून सह/उप सचिव (उर्जा-३), उद्योग,उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना मंजूर झालेली रक्कम रू.५६५.४१ कोटी (रुपये पाचशे पासष्ट कोटी एक्केचाळीस लाख फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरित करुन महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांचे नावे स्वतंत्ररीत्या धनादेश काढून वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

६. महाराष्ट्र विनियोजन विधेयक-२०१८, परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दि.०२/०४/२०१८ च्या परिपत्रकातील परिच्छेद ७ खालील अनुक्रमांक (१) ते (९) मधील तपासणी सूचीमधील अट क्र. (२), (८) व (९) या अटींची पुर्तता होत असून इतर अटी लागू नसल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या अनुक्रमांक २ ते ७ पैकी अनुक्रमांक ५ ची पुर्तता केली असून उर्वरित बाबी लागू नाहीत, अनुक्रमांक ८ समोरील तपासणी सूचीतील १ ते १० पैकी ३, ४, ९ व १० मधील अटींची पूर्तता झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे, उर्वरित अटी लागू नाहीत. तसेच वित्त विभाग परिपत्रक क्र अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. २५ जानेवारी, २०१९. अन्वये प्राप्त सूचनानुसार एकूण अर्थसंकल्पित निधीच्या ८० टक्केच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यात येत आहे.

७. या लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्यासाठी सादर करण्यात आलेल्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की, या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षीप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाण पत्र प्रलंबित नाही. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २७७/१४६१, दिनांक ०४.०२.२०१९ तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ३५/१९/व्यय-१६, दिनांक १३.०२.२०१९ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१९०२२०१५२६५८९५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Nanasaheb Rajaram Dhane
Date: 2019.02.20 15:28:23 +05'30'

(ना. रा. ढाणे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१
२. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधार कंपनी मर्यादित, हॉगकॉंग बँक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई
३. सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर नं.१, १३ वा मजला, कफ परेड, कुलाबा, मुंबई-०५
४. मा.विरोधी पक्ष नेता विधानसभा / विधानपरिषद महाराष्ट्र विधान मंडळ, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
६. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी, अराप / रालेवि-१, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
१०. निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.

११. कक्ष अधिकारी (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
१२. विशेष कार्य अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१३. वित्त विभाग, (अर्थसंकल्प-३ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
१४. मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय
१५. इमारत, कर मार्ग रामकृष्ण चेंबूर, ३ रा मजला, चेंबुर, (पूर्व), मुंबई-४०००७१.
१६. निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.